केंद्र पुरस्कृत शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम योजनेकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी वितरीत करणेबाबत.
**(लेखाशिर्ष २४०१ A५३९)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र.क्र.११ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - २९ मार्च, २०१७.

**वाचा -**

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. NO.1-7/2014-RFS-III दिनांक ०७-०२-२०१७.
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. शाशेअ – २०१६ / प्र. क्र.१५८( भाग-२) /४-अे.

**शासन निर्णय-**

राज्यात केंद्र पुरस्कृत शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम या योजनेंतर्गत् मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना ) ( २४०१ A५३९) ३३- अर्थसहाय्य या योजनेखाली केंद्र शासनाने दुसरा हप्ता म्हणून रु. ९०.०७ लाख इतका निधी वितरीत केलेला आहे.

कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ४ येथील प्रस्तावास अनुसरुन मागणी टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना ) (२४०१ A५३९) ३३- अर्थसहाय्य या योजनेकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त रु. ९०.०७ लाख निधीपैकी रु. १०.८७ लाख ( अक्षरी रुपये दहा लाख सत्त्याऐंशी हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग / नियंत्रक अधिकारी म्हणून सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व क्रमांक २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३०२/ अर्थोपाय, दि. २०-०९-२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३००९४७२७५५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan
Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.30 10:56:48 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.